**राज्यातील इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील व्यावसायिक शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी जिल्हानिहाय वसतीगृहे सुरु करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : वगृयो-२०२०/प्र.क्र.०१/योजना-५**
३ रा मजला, नवीन प्रशासन भवन,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,मुंबई-४०००३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी,२०२३.

**वाचा :-**

१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक बीसीएच-२०१०/ प्र.क्र.४३०/मावक-४, दिनांक २६/०७/२०११.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक :आवगृ-२०११/प्र.क्र.१७१/का-१२, दिनांक ११/११/२०११.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्रमांक बीसीएच-२०१६/ प्र.क्र.२९३/शिक्षण-२, दिनांक ०६/०१/२०१७.
४) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक :आवगृ-२०१६/प्र.क्र.८७/का-१२, दिनांक २७/११/२०१८.
५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्रमांक बीसीएच-२०१८/ प्र.क्र.३१९/शिक्षण-२, दिनांक २१/१२/२०१८
६) विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग,शासन निर्णय क्रमांक : इमाव-२०१६/ प्र.क्र.५८/विजाभज-१, दिनांक ३०/१/२०१९
७) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्रमांक बीसीएच-२०२०/ प्र.क्र.२८६/शिक्षण-२, दिनांक १५/०६/२०२१
८) इतर मागास बहुजन कल्याण विभाग,शासन निर्णय क्रमांक : वगृयो-२०२०/प्र.क्र.०१/ योजना-५, दिनांक २९.११.२०२२

**प्रस्तावना :-**

राज्यात जिल्हयाच्या ठिकाणी केंद्र शासनाच्या बाबु जगजीवन राम छात्रावास योजनेअंतर्गत केंद्र शासनाकडून मिळणाऱ्या अर्थसहाय्यातून मागणीनुसार इतर मागास प्रवर्गातील मुलांसाठी १८ व मुलींसाठी १८ असे एकूण ३६ नवीन शासकीय वसतिगृह सुरु करण्याबाबतचा शासन निर्णय दि.३०.०१.२०१९ रोजी निर्गमित करण्यात आलेला आहे. या योजनेंतर्गत ४ जिल्हयात शासकीय जमीन उपलब्ध झाली असून तसा प्रस्ताव केंद्र शासनाकडे विभागामार्फत सादर करण्यात आला होता. तथापि त्या प्रस्तावावर केंद्र शासनाने काही त्रुटी उपस्थित केल्या असून सदर त्रुटींची पूर्तता करणेबाबत कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येत आहे, भविष्यात सदर योजनेअंतर्गत जिल्हयाच्या ठिकाणी वसतिगृह बांधण्यासाठी जागा उपलब्ध झाल्यास सदर योजना कार्यान्वित होईल व भाडयाच्या इमारती घेऊन वसतिगृहे सुरु करण्याबाबतची दि. २९.११.२०२२ च्या शासन निर्णयान्वये तयार करण्यात आलेली योजना बंद करण्यात येईल.

उपरोक्त वाचा क्र. ८ येथील दि. २९.११.२०२२ च्या शासन निर्णयान्वये इतर मागास वर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील मॅट्रीकोत्तर व्यावसायिक शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी प्रत्येक जिल्हयाच्या ठिकाणी १०० विद्यार्थी क्षमतेचे मुलांसाठी १ व मुलींसाठी १ या प्रमाणे ३६ जिल्हयाच्या ठिकाणी ७२ शासकीय वसतिगृहे भाडयाच्या इमारती घेऊन, मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा, १९५० व संस्था नोंदणी कायदा, १८६० अंतर्गत नोंदणीकृत स्वयंसेवी संस्थांच्या (N.G.O) माध्यमातून सुरु करण्यास व त्यासाठी रु.७३.८१ कोटी इतक्या खर्चास मान्यता देण्यात आली आहे. तथापी वसतिगृहे स्वयंसेवी संस्थांना देणेबाबत वर्तमानपत्रांमध्ये काही ओबीसी संघटनांकडून तसेच व्यक्तींकडून नाराजी व्यक्त करण्यात आली होती. त्यामुळे सदर बाब विचारात घेता, सदर वसतिगृहे स्वंयसेवी संस्थाना चालविण्यासाठी न देता ती शासनाने चालवावी असा मतप्रवाह असल्याने वसतिगृहे चालविण्यासाठी शासनाने स्वत: वसतिगृहासाठी इमारत भाडयाने घेवून चालवावीत याबाबत निर्णय घेणेची बाब विचाराधिन होती त्यानुषंगाने खालील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा, १९५० व संस्था नोंदणी कायदा, १८६० अंतर्गत नोंदणीकृत स्वयंसेवी संस्थांना (N.G.O) वसतिगृह चालविण्यासाठी देण्याऐवजी शासनाने स्वत: वसतिगृहासाठी इमारत भाडयाने घेवून प्रत्येक जिल्ह्यात, इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील १०० मुले व १०० मुली या मर्यादेत प्रति जिल्हा २०० याप्रमाणे ३६ जिल्ह्यांसाठी एकूण ७२०० पात्र विद्यार्थ्यांना प्रतिवर्षी प्रति विद्यार्थी/विद्यार्थीनीना भोजन, निवास व इतर शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी शासनामार्फत जिल्हानिहाय दोन याप्रमाणे ७२ वसतीगृहे कार्यान्वित करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०२२८१२४४०६३१३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशा नुसार व नावाने,

NANDKUMAR VERMA

Digitally signed by NANDKUMAR VERMA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DCD3577EBF0E05E2A8B57095C152DC6CFB37C2BB83DA197788645DD8A362EBC5, cn=NANDKUMAR VERMA
Date: 2023.02.28 12:49:18 +05'30'

**(नंद कुमार)**
**अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्ष नेता,विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई/नागपूर.
६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १./२, मुंबई/नागपूर.

८.जिल्हाधिकारी, सर्व जिल्हे.
९.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
१०.सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग.
११.सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण विभाग.
१२.सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद.
१३.निवासी लेखा परिक्षक, मुंबई.
१४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६.निवड नस्ती (योजना-५).